मागणी क्र.डी-५ मुख्यलेखाशिर्ष २४०४ "(२७) लहान बांधकामे"(सार्वजनिक बांधकाम विभाग) या शिर्षाखाली दुग्धव्यवसाय विकास विभागाकरिता सन २०१८-१९ मधील मंजूर १००% निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. दुवियो-१३१८/प्र.क्र.१८४/पदुम-९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक- ०४ ऑक्टोंबर, २०१८

वाचा:- १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि.२/४/२०१८.
२) क्र.आदुवि-४/अंपशा/३०% अनुदान/प्र.क्र.२०९/भाग-२/ २०१८-१९/१२१३, दि.१०/०८/ २०१८.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०१८ महाराष्ट्र विधानमंडळाने मंजूर केल्यानंतर वित्त विभागाच्या दि.०२/०४/२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये सन २०१८-१९ करिता मागणी क्र. डी-५, मुख्य लेखाशिर्ष २४०४ दुग्धव्यवसाय विकास (योजनेतर/दत्तमत) याखालील "(२७) लहान बांधकामे" या तपशिलवार शिर्षाखाली अर्थसंकल्पीत ७० टक्के निधी वितरणास मान्यता देण्यात आली होती. या बाबीवरील खर्च भागविण्याकरिता वितरित ७० टक्के निधी बहूतांशी खर्च पडला आहे. आणखी निधीची आवश्यकता असल्यामुळे आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांच्या दि.१०/०८/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अर्थसंकल्पीत १०० टक्के निधी वितरित करण्याची विनंती केली होती. त्यास अनुसरुन "(२७) लहान बांधकामे" या उपलेखाशिर्षातर्गत मंजूर असलेला १०० टक्के निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१८-१९ करिता मागणी क्र.डी-५, मुख्य लेखाशिर्ष २४०४ दुग्धव्यवसाय विकास (योजनेतर/ दत्तमत) याखालील "(२७) लहान बांधकामे" या उपलेखाशिर्षातर्गत मंजूर असलेला खालील तक्त्यात नमूद लेखाशिर्षनिहाय उर्वरित रु.२०७.९६ लक्ष (अक्षरी रुपये दोनशे सात लक्ष शहाण्णव हजार मात्र) इतका निधी (१००टक्के निधी) वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| गौणशिर्ष | संगणक सांकेतांक | सन २०१८-१९ मंजूर अनुदान | वितरित सन २०१८-१९ ७०% | ३१/८/२०१८ पर्यंत झालेला खर्च | वितरित च्या आधारे शिल्लक अनुदान | उर्वरित ३०% वितरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, २७- लहान बांधकामे | २४०४०६८२ | ३३४.३८ | २३४.०७ | २३२.०२ | १.९८ | १००.३१ |
| आरे वसाहत २७- लहान बांधकामे | २४०४०७०६ | २९८.०५ | २०८.६४ | २०८.६४ | ०० | ८९.४१ |
| प्रकल्प अधिकारी, दापचरी २७- लहान बांधकामे | २४०४०७७१ | ६०.७७ | ४२.५३ | ३८.०० | ४.६३ | १८.२४ |
| एकूण मंजूर अनुदानाच्या उर्वरित ३०% वितरित अनुदान | | | | | | २०७.९६ |

उपरोक्त वितरित निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही वित्त विभागाशी समन्वय साधून अर्थसंकल्प कार्यासनामार्फत (पदुम-१६) त्वरित करण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३८/२०१८/व्यय-२/ दि.२७/०९/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००४१२५२५९५६०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.10.04 12:55:51 +05'30'

**( अनूप कुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (पदुम)/मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई-३२
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
६) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा अनुज्ञेयता लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
८) आयुक्त,दुग्धव्यवसाय विकास,वरळी,मुंबई-१८
९) अप्पर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
१०) सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
११) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/नागपूर.
१२) निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
१३) संचालक, लेखा व अनुज्ञेयता,मुंबई.
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी,आरे.
१५) प्रकल्प अधिकारी,दुग्ध प्रकल्प,दापचरी.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी.पालघर
१७) कक्ष अधिकारी, (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती.